**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, शिंदीदिगर, सेलगधा, जांगठी, कंकाळमाळ, वलवाळ, गमन, खडकापाणी, त्रिशुळ व दहेल येथे प्रीफॅब्रीकेटेड फायबर शेड उभारण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१६/प्र.क्र. ३२८ /का.१३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ डिसेंबर, २०१६.

वाचा :- आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. शाआबां-२०१६/प्र.क्र३०/का. (६)/७६६०, दि. २१.१०.२०१६.

**प्रस्तावना :**

नंदुरबार जिल्हातील अतीदुर्गम असलेल्या अक्कलकुवा व धडगाव या तालुक्यांतील ९ शासकीय आश्रमशाळांच्या इमारतींची अवस्था अत्यंत खराब झाल्याने व तेथे इमारत बांधकाम साहित्याची वाहतुक करून नवीन टाईप प्लॅन नुसार RCC इमारती बांधणे शक्य नाही तसेच सदर गावे नवसंजीवनी योजनेत समाविष्ट आहेत. या गावांतील मानव विकास निर्देशांक सुद्धा खुपच कमी आहे. यामुळे याभागातील शाळा बंद करणे किंवा इतरत्र समायोजित करणे शक्य नाही. यास्तव **शासकीय आश्रमशाळा, शिंदीदिगर, सेलगधा, जांगठी, कंकाळमाळ, वलवाळ, गमन, खडकापाणी, त्रिशुळ व दहेल येथे प्री फॅब्रीकेटेड फायबर शेड** बांधकामाबाबतचे अंदाजपत्रक आयुक्त, आदिवासी विकास यांनी प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले होते.

२. सदर अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे तांत्रिक सहमतीकरिता पाठविण्यात आले असता ज्या बाबी दरसुचीत समाविष्ट नाहीत त्या बाबींचे दर अधिक्षक अभियंता, यांच्याकडून मंजूर करून घेण्याच्या अटींच्या अधीन राहून उक्त शाळांच्या अंदाजपत्रकीय रकमेस व प्रस्तावास त्यांनी तांत्रिक सहमती दिलेली आहे. त्याअनुषंगाने उक्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांचे अंतर्गतच्या खालील ९ शासकीय आश्रमशाळांसाठी **प्री फॅब्रीकेटेड फायबर शेड उभारण्याच्या** सविस्तर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी शिफारस केल्याप्रमाणे खालील नमूद आश्रमशाळा निहाय दर्शविलेल्या अंदाजपत्रकिय रकमेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शासकीय आश्रमशाळेचे नाव | अंदाजपत्रकिय रक्कम (रू.) |
|---|---|---|
| १ | शिंदीदिगर, ता. धडगाव | ९७,६८,०५६ |
| २ | सेलगधा, ता. धडगाव | ९७,५७,८०१ |
| ३ | जांगठी, ता. अक्कलकुवा | ९६,९७,५२७ |
| ४ | कंकाळमाळ, ता. अक्कलकुवा | ९७,५६,०७३ |
| ५ | वलवाळ, ता. धडगाव | ९७,६६,७२८ |
| ६ | गमन, ता. अक्कलकुवा | ९६,८६,३८२ |
| ७ | खडकापाणी, ता. अक्कलकुवा | ९७,५५,२४५ |
| ८ | त्रिशुळ, ता. धडगाव | ९७,४९,९८० |
| ९ | दहेल, ता. अक्कलकुवा | ९७,५०,८५९ |

**अटी:-** (१) काम सुरु करण्यापूर्वी शाळानिहाय नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

(२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.

(३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी सक्षम स्तरावरुन विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

(४) अंदाजपत्रकावर अधिक्षक अभियंता यांचे साक्षांकन असणे आवश्यक आहे.

(५) ज्या बाबी दरसुचीत समाविष्ट नाहीत त्या बाबींचे दर अधिक्षक अभियंता, यांच्याकडून मंजूर करून घ्यावेत.

(६) उक्त बांधकामांसाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकाम सुरु करु नये.

(७) सदरची कामे आदिवासी विकास विभागांतर्गत निर्माण केलेल्या बांधकाम व्यवस्थापन कक्षाकडून करुन घ्यावीत.

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु-मोटो रिट याचिका क्र. १४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे आवश्यक आहे. सदर काम सुरु करण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे व्हिडीओ शुटींग करुन त्याची सी.डी. शासनास सादर करणे बंधनकारक राहील. तसेच प्रस्तावित शेडस् चे बांधकाम किती मुदतीत पुर्ण करण्यात येणार आहे याबाबतचे लेखी पत्र संबंधित कंत्राटदार / ठेकेदार यांचेकडून प्राप्त करुन ते शासनास तात्काळ सादर करावे.

४. बांधकामाचा दर्जा तसेच कामास होणारा विलंब यांवर देखरेख करण्याची जबाबदारी संबंधित आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास, प्रकल्प, तळोदा यांची राहील.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६१२२८१२२६१६१९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2016.12.28 12:30:43 +05'30'

**( सु.ना. शिंदे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
३) मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अधिक्षक अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
५) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण,जि. नाशिक.
६) महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
९) आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण.
१०) कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.